**महाराष्ट्र शासन**

**गृह विभाग**

**शासन ज्ञापन क्रमांक- दुरुस्ती-०११७/प्र.क्र.०३/पोल-७.**

मंत्रालय, दुसरा मजला,

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई-४०००३२.

दिनांक २० मार्च २०१७.

**विषय** :- पोलीस वसाहत, कन्नमवार नगर, विक्रोळी (पूर्व), मुंबई, येथील इमारत क्र.२२६ व २२८ यांची दुरुस्ती करण्याबाबत प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.

**संदर्भ** :-
१) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र. विअप्र-२०१४/ प्र.क्र.४९/ १४/ विनियम, दिनांक ०५.०१.२०१५.
२) शासन निर्णय, वित्त विभाग, क्र. विअप्र-२०१./प्र.क्र.३०/१३/विनियम, भाग-२, दिनांक १७.०४.२०१५.
३) पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई, यांच्या कार्यालयाचे पत्र क्र. पोआ./कक्ष-८(१३)/शा.३२३/२०१६, दिनांक ०३.११.२०१६.

**ज्ञापन** :-

पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई, यांनी त्यांच्या संदर्भाधीन पत्राद्वारे, पोलीस वसाहत, कन्नमवार नगर, विक्रोळी (पूर्व), मुंबई, येथील इमारत क्र.२२६ व २२८ यांची दुरुस्ती करण्याचा प्रस्ताव सादर केला आहे.

२. उक्त कामासाठी कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, उत्तर मुंबई, यांनी सन २०१५-१६ च्या दरसूचीनुसार तयार केलेले रु.१,७५,८१,०१५/- इतक्या खर्चाचे अंदाज सादर केले आहेत.

३. उक्त खर्चाचे अंदाज सार्वजनिक बांधकाम विभागाने तपासले आहेत व ते रु.१,७५,८१,०१५/- सुधारित केले आहेत. त्या अनुसार, पोलीस वसाहत, कन्नमवार नगर, विक्रोळी (पूर्व), मुंबई, येथील इमारत क्र.२२६ व २२८ यांच्या दुरुस्तीची, पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई, यांच्या संदर्भाधीन पत्रात उल्लेख केलेली, कामे करण्यासाठी, **रु.१,७५,८१,०१५/-** इतक्या खर्चाच्या अंदाजास, पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई यांनी खर्चाचे अंदाज साक्षांकित करावे या अटीवर, याद्वारे, मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

४. उक्त कामासाठी येणारा खर्च हा बी-१, मुख्य लेखाशीर्ष, २०५५, पोलीस (०२), शहर पोलीस, शहर पोलीस आस्थापना (दत्तमत) (२०५५ ००९७), २७, लहान बांधकामे, या लेखाशीर्षाखाली उपलब्ध असलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

५. हे ज्ञापन सार्वजनिक बांधकाम विभागाच्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

**६.** हे ज्ञापन महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०१७०३२११२३५१८१६२९ असा आहे. हे ज्ञापन डीजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Swapnil Gopal Borse

Digitally signed by Swapnil Gopal Borse
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Home Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=66835707253ff77ef0e333eb3ad582f9b876d443b2654088832e43dcad21c52a, cn=Swapnil Gopal Borse
Date: 2017.03.21 12:35:58 +05'30'

**(स्वप्नील गोपाल बोरसे)**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.

**प्रति,**
पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई.

**प्रत :-**

१) अपर मुख्य सचिव, वित्त विभाग (व्यय-७/विनियम), मंत्रालय, मुंबई.
२) प्रधान सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग (इमा-२), मंत्रालय, मुंबई.
३) अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडल, मुंबई.
४) कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, मध्य मुंबई, वरळी, मुंबई.
५) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
६) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१, मुंबई.
७) निवड फाईल (पोल-७).